**नौरोसजी वाडिया मॅटर्निटी हॉस्पिटल, परळ, मुंबई यांना रुपये २,२९,४३,६४७/- इतके सहायक अनुदान मंजूर करण्याबाबत ....**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः पुमाअ-२०२२/ प्र.क्र.८५/राकावि-२,**
गो.ते.रूग्णालय आवार, संकूल इमारत, १० वा मजला,
बी-विंग, मंत्रालय, मुंबई - ४००००१
दिनांक : २८ मार्च, २०२३.

वाचा -

**१) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२२/प्र.क्र.४३/अर्थ-३, दिनांक ०४ एप्रिल,२०२२.**
**२) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२२/प्र.क्र.५०/अर्थ-३, दिनांक ३० मे,२०२२.**
**३) सार्वजनिक आरोग्य विभाग,शासन परिपत्रक क्र.अनुदान-२००९/प्र.क्र.४२ /आरोग्य-५, दिनांक.१३ जानेवारी, २०१०.**
**४) सहसंचालक, आरोग्य सेवा (अर्थसंकल्प व प्रशासन), मुंबई यांचे पत्र जा.क्र.ससंआसे/सहा.अनु/कक्ष ६४/प्रस्ताव/२०२१-२२/१८३५२-५३/२०२१, दिनांक १६ नोव्हेंबर,२०२१ व पत्र क्र.जा.क्र.ससंआसे/पावसाळी अधि./पुरवणी मागणी/कक्ष ६४/९५६१/२०२२, दिनांक ०९ जून, २०२२.**
**५) सार्वजनिक आरोग्य विभाग,शासन निर्णय क्र.अनुदान-२०२१/प्र.क्र.१०९/राकावि-२, दिनांक.०३ जून, २०२२.**
**६) सार्वजनिक आरोग्य विभाग,शासन निर्णय क्र.पुमाअ-२०२२/प्र.क्र.८५/राकावि-२, दि.३१ जानेवारी, २०२३ व समक्रमांक दि.१० फेब्रुवारी, २०२३ चे शासन शुध्दीपत्रक.**

प्रस्तावना -

सार्वजनिक आरोग्य विभागाच्या शासन निर्णय दि.१३.०१.२०१० अन्वये नौरोसजी वाडीया मॅटर्निटी रुग्णालय, परळ, मुंबई येथील रुग्णालयास शासनाकडून अनुदान मंजूर करण्याबाबत सुधारित धोरण निश्चित करण्यात आलेले असून त्यानुसार हॅास्पिटलच्या एकूण खर्चातील केवळ वेतन भत्ते व औषधावरील खर्चासाठी संस्थेला अनुदान अनुज्ञेय असून हे अनुदान एकूण खर्चाच्या ८५% मर्यादेत (पैकी ५०% राज्यशासनाचा हिस्सा व उर्वरित ५०% बृहन्मुंबई महानगरपालिकेचा हिस्सा) मंजूर केले जाते. सहसंचालक, आरोग्य सेवा (अर्थसंकल्प व प्रशासन), मुंबई यांचा दिनांक १६ नोव्हेंबर, २०२१ अन्वये नौरोसजी वाडीया मॅटर्निटी हॉस्पिटल, परळ, मुंबई या संस्थेस सन २०२०-२१ च्या खर्चावर सन २०२१-२२ साठी रु.१८,९८,५२,४१६/- इतक्या रक्कमेचा प्रस्ताव शासनास प्राप्त झाला आहे. त्यापैकी वित्त विभागाच्या मान्यतेनंतर संदर्भ क्र.५ अन्वये रु.१५,००,००,०००/- इतके तसेच संदर्भ क्र.६ अन्वये रु.५८,९३,८४२/- इतके सहायक अनुदान मंजुर करण्यात आले असून उर्वरित रु.३,३९,५९,४१६/- (अक्षरी रुपये तीन कोटी

एकोणचाळीस लाख एकोणसाठ हजार चारशे सोळा फक्त) इतके सहायक अनुदान मंजुर करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय -**

नौरोसजी वाडीया मॅटर्निटी रुग्णालय, परळ, मुंबई या संस्थेस उपरोक्त रु.३,३९,५९,४१६/- (अक्षरी रुपये तीन कोटी एकोणचाळीस लाख एकोणसाठ हजार चारशे सोळा फक्त) पैकी रु.२,२९,४३,६४७/- (अक्षरी रुपये दोन कोटी एकोणतीस लक्ष त्रेचाळीस हजार सहाशे सत्तेचाळीस फक्त) इतकी रक्कम सहायक अनुदान म्हणून मंजुर करण्यास, वित्तीय वर्ष सन २००९-१० ते सन २०१९-२० या कालावधीत उपलब्ध करुन देण्यात आलेल्या सहायक अनुदानाच्या लेखापरिक्षणाबाबत मा.राज्यपाल महोदयांच्या भविष्यातील निर्देशास अधीन राहून, शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर खर्च मागणी क्रमांक आर-१, २२१० -वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य,०१-नागरी आरोग्य सेवा- विषम चिकित्सा, ११०- रुग्णालये व दवाखाने, ( ०३) मुफसल रूग्णालये व दवाखाने यांना सहाय्यक अनुदाने, (०३)(०१)- अध्यापनेत्तर रूग्णालये व दवाखाना यांना सहाय्यक अनुदान, ३१ सहाय्यक अनुदाने, (अनिवार्य) ( २२१० ०१७३) लेखाशिर्षाखाली सन २०२२-२३ साठी बी.डी.एस. वर उपलब्ध करण्यात आलेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा.

३. नौरोसजी वाडिया मॅटर्निटी हॉस्पिटल, परळ, मुंबई या संस्थेस अनुदान वितरीत करण्यास उपसंचालक, आरोग्य सेवा, मुंबई मंडळ, ठाणे यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

४. नौरोसजी वाडीया मॅटर्निटी रुग्णालयास ज्या अटी व शर्ती लागू आहेत. (उदा. गरीब रुग्णांना मोफत किंवा कमी दराने सेवा पुरविणे) त्यांचे पालनासंबंधीची तपासणी संचालक, आरोग्य सेवा, मुंबई यांनी करणे आवश्यक आहे.

५. ज्या-ज्या वेळी निरिक्षणासाठी महालेखापाल, महाराष्ट्र-१, मुंबई यांना नौरोसजी वाडिया मॅटर्निटी रुग्णालयाचे हिशेब पाहिजे असतील त्या-त्या वेळी ते प्रस्तुत कागदपत्रांसहित संस्थेने सादर करावेत.

६. शासकीय अनुदान म्हणून मिळणाऱ्या रकमेचे हिशेब नौरोसजी वाडिया मॅटर्निटी हॉस्पिटल, परळ, मुंबई यांनी त्यांच्या नेहमीच्या इतर कार्यक्रमातून वेगळे ठेवणे आवश्यक आहे.

७. मंजूर नसलेल्या बाबींवरील खर्चाचा समावेश अनुदानात करण्यात आल्याचे आढळून आल्यास अथवा सहायक अनुदानाचा गैरवापर झाल्यास त्या खर्चाची एक रकमी वसुली करण्याचा अधिकार शासनास राहील. त्याकरिता वेळेचे बंधन असणार नाही.

८. हा शासन निर्णय, वित्त विभाग क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनिमय, भाग-२, दि.१७ एप्रिल, २०१५ च्या शासन निर्णयानुसार वित्तीय अधिकार नियमामध्ये करण्यात आलेल्या सुधारणाप्रमाणे वित्तीय

अधिकार नियम पुस्तिका, १९७८ चा भाग पहिला, उपविभाग-एक अनुक्रमांक २७ मधील नियम क्र.१४९ नुसार प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

९. सदर आदेश वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.१२७/व्यय-१३, दिनांक ०३/०३/२०२३ अन्वये देण्यात आलेल्या मान्यतेच्या अनुषंगाने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०३२११४४८२२३११७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

MAHESH MADHUKAR LAD

Digitally signed by MAHESH MADHUKAR LAD
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC HEALTH DEPARTMENT, 2.5.4.20=25beab36016c9d18b34e813ce2c51ae3ba862f5ee940326a80ef8dfa067b2f3b, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=2B0B7B24B48EA4D47E171EF81F64A0D535EBB08400DA6060265D4872BADAEACA, cn=MAHESH MADHUKAR LAD
Date: 2023.03.28 17:38:46 +05'30'

**(महेश म. लाड)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. संचालक, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई.
२. संचालक, आरोग्य सेवा (२), आरोग्य सेवा संचालनालय, पुणे.
३. सहसंचालक, आरोग्य सेवा ( अर्थसंकल्प व प्रशासन ), मुंबई/पुणे.
४. उप संचालक, आरोग्य सेवा, मुंबई मंडळ, ठाणे.
५. सहाय्यक संचालक, ( लेखा व सेवा परिक्षा ), आरोग्य सेवा, पुणे.
६. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परिक्षा ),महाराष्ट्र-१, मुंबई.
७. जिल्हा कोषाधिकारी, ठाणे/ पुणे.
८. वित्त विभाग (अर्थ-३/व्यय-१३), मंत्रालय, मुंबई-३२.
९. उप सचिव ( अर्थसंकल्प / राकावि-२ ), सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुबई-१.
१०. अर्थसंकल्प शाखा, सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुबई-१.
११. अध्यक्ष, नौरोसजी वाडिया मॅटर्निटी हॉस्पिटल, परळ, मुंबई.
१२. निवड नस्ती (राकावि-२), सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई.